जलसंपदा विभागांतर्गत कार्यकारी अभियंता/उप अभियंता/ सहायक अभियंता श्रेणी-२/शाखा अभियंता/ कनिष्ठ अभियंता (स्थापत्य/ यांत्रिकी/विद्युत व यांत्रिकी) या संवर्गातील अभियंत्याच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत

## महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

### शासन निर्णय क्रमांकः बदली-१०१४/प्र.क्र.८१/२०१४)/आ(संनि)

गोकूळदास तेजपाल रुग्णालय संकूल, ४ था मजला

नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग,मुंबई- ४०० ००१

तारीख: १४ नोव्हेंबर, २०१४

वाचा:-

१) **महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५**

२) **शासन अधिसूचना क्र. बदली-२००७/(६/२००७)/आ(संनि), दि.२५.४.२००७.**

प्रस्तावना:-

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदलीचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतुद करण्याकरीता अधिनियम,२००५ अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम-६ मधील दुसरे परंतुकातील तरतुदीनुसार कार्यकारी अभियंता/उप अभियंता/ सहायक अभियंता श्रेणी-२/शाखा अभियंता/कनिष्ठ अभियंता स्तरावरील संवर्गातील बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ६ मधील दुसऱ्या परंतुकानुसार व कलम ७ नुसार जलसंपदा विभागांतर्गत कार्यकारी अभियंता/उप अभियंता/ सहायक अभियंता श्रेणी-२/शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता स्तरावरील संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार खालीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत

| अ.क्र. | गट - पदनाम | वेतनश्रेणी | सक्षम प्राधिकारी | बदली अधिकार प्रत्यार्पित करावयाचा अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता, गट-अ | रु.१०६५०-१५८५० | मा.मुख्यमंत्री महोदय | प्रधान सचिव (जलसंपदा) |
| २ | उप अभियंता, गट-अ | रु.८०००-१३५०० | मा.मंत्री महोदय | मुख्य अभियंता |
| ३ | स.अ.श्रेणी-२ गट-ब<br>शाखा अभियंता<br>कनिष्ठ अभियंता | रु.६५००-१०५००<br><br>रु. ५५००-९००० | मा.मंत्री, जलसंपदा (सध्या मा.राज्यमंत्री महोदयांना प्रत्यार्पित) | मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता यांचेशी सल्लामसलत करुन |

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ ,नुसार सविस्तर मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११५१२०४१९५२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Hiralal Tatya Mendhegiri

Digitally signed by Hiralal Tatya Mendhegiri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary (CAD), postalCode=400032, st=Maharashtra, cn=Hiralal Tatya Mendhegiri
Date: 2014.11.15 12:23:12 +05'30'

( हि. ता. मेंढेगिरी )
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय
२. सर्व कार्यकारी संचालक/महासंचालक/सर्व मुख्य अभियंता/सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
३. अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे.
४. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सह सचिव (सेवा)/सह सचिव(प्रशा) उप सचिव(आस्था), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अवर सचिव)/(सेवा)/(राकसे)/(संनि)/आस्था/गृ. व्य. जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
७. जलसंपदा विभागातील सर्व आस्थापना कार्यासने.
८. आ(संनि) कार्यासन संग्रहार्थ.